मौजे वाढीव संगमनेर (ता.संगमनेर, जि.अहमदनगर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या पुनर्सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु - २०१८/प्र.क्र.१६५/पापु १८ (१७)**
**७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,**
**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१**
**दिनांक: ०४ मार्च, २०२२.**

<u>वाचा</u> :-

१) सुधारीत प्रशासकीय मान्यता, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय, क्र. नापापु २००८/प्र.क्र.१९७/ पापु-०९, दि. १८ मे, २०१०.
२) मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र, क्र. जा.क्र.मुअ/नाशिक/तांशा/धा४२/५६९, दिनांक ०२/०४/२०१८.
३) पुर्नसुधारीत प्रशासकीय मान्यता, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय, क्र. ग्रापापु २०१८/प्र.क्र.१६५/ पापु-१८(१७), दि. २३ डिसेंबर, २०२१.

<u>प्रस्तावना</u> :-

मौजे वाढीव संगमनेर (ता. संगमनेर, जि. अहमदनगर ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्रमांक १ अन्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी अंदाजपत्रकास पुनर्सुधारीत करण्याची मागणी केलेली आहे. त्यानुसार, मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या पुनर्सुधारीत आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्रमांक २ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या पुनर्सुधारीत आराखडयास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मौजे वाढीव संगमनेर (ता. संगमनेर, जि. अहमदनगर) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ६३१०.५३ लक्ष (ढोबळ) (अक्षरी रु.त्रेसष्ट कोटी दहा लक्ष त्रेपन्न हजार फक्त ) एवढ्या पुनर्सुधारीत किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील **अटींच्या** अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारीत किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित नगरपरिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित उप विभागीय अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, उपविभाग संगमनेर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत नगरपरिषद/महानगरपालिका जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित उप विभागीय अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, उपविभाग संगमनेर व मुख्याधिकारी संगमनेर नगरपरिषद यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित नगरपरिषद/महानगरपालिकेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित नगरपरिषद/महानगरपालिका ) योजना हस्तांतरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित नगरपरिषद/महानगरपालिका यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

**०२. तसेच याद्वारे उपरोक्त वाचा क्र. ३ येथील दिनांक २३ डिसेंबर, २०२१ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.**

**०३.** या योजनेच्या पुनर्सुधारीत किंमतीतील वाढीव खर्च रुपये १८९.९ लक्ष ( अक्षरी रुपये एक कोटी एकोणनव्वद लक्ष नऊ हजार फक्त) हा मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १९२ महानगरपालिका/नगरपरिषदांना सहाय्य, (०२) (०२) नगरपालिकांच्या/ नगरपरिषदांच्या पाणी पुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२१५ १६४७) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुत योजनेस पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५८/व्यय३, दि.०८/०४/२०२१ व क्र. व्यअस-२०२१/प्र. क्र. १०१/अर्थ-२, वित्त विभाग यांच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२८१९४६५४४०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, pseudonym=70D3D439CAAEA9606F4BC7818EBB80F4CAED8330, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2022.03.04 15:44:27 +05'30'

**(रविंद्र गो. भराटे)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
७) मुख्याधिकारी, नगर परिषद, संगमनेर, जि. अहमदनगर.
८) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक.

१२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अहमदनगर.
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१५) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१६) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, अहमदनगर.
१७) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर.
१८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२०) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२१) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासने (पापु-०४ व २०), पा. पु. व स्व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.
२३) निवड नस्ती कार्यासन पापु-१८.